जल जीवन मिशन अंतर्गत सर्वसाधरण (राज्य हिस्सा) घटकाखालील निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला वितरित करणेबाबत (लेखाशीर्ष २२१५ २०७१)

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांकः जजीमि-२०२२/प्र.क्र.७४०/पापु १०
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख: ३ मे,२०२३

वाचा-

१. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.जजीमि -२०२०/ प्र.क्र.१३८/ पापु १० (०७), दि.०४.०९.२०२०
२. शासन निर्णय समक्रमांक दि.१३.१२.२०२२
३. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.जजीमि २०२२/ प्र.क्र.७०२/ पापु १०, दि.०३.०१.२०२३
४. अवर सचिव, पेयजल व स्वच्छता विभाग, जल शक्ती मंत्रालय, भारत सरकार यांचे आदेश क्र.W-११०२०/१९७/२०१५-Water-I/४०, दि.०९.०१.२०२३
५. शासन निर्णय समक्रमांक दि.०३.०२.२०२३
६. अवर सचिव, पेयजल व स्वच्छता विभाग, जल शक्ती मंत्रालय, भारत सरकार यांचे आदेश क्र.W-११०२०/१९७/२०१५-Water-I, दि.१६.०३.२०२३
७. शासन निर्णय समक्रमांक दि.२४.०३.२०२३
८. अवर सचिव, पेयजल व स्वच्छता विभाग, जल शक्ती मंत्रालय, भारत सरकार यांचे आदेश क्र.W-११०२०/१९७/२०१५-Water-I/७६, दि.२७.०३.२०२३
९. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.जजीमि २०२२/ प्र.क्र.८८/ पापु १०, दि.२८.०३.२०२३
१०. शासन निर्णय समक्रमांक दि.३१.०३.२०२३

प्रस्तावना-

संदर्भिय क्र.१ दि.०४.०९.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात जल जीवन मिशन राबविण्याकरीता मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. जल जीवन मिशन अंतर्गत केंद्र व

राज्य वित्तीय आकृतीबंध १:१ आहे. जल जीवन मिशन अंतर्गत सन २०२२-२०२३ या वित्तीय वर्षाकरीता केंद्र शासनाने संदर्भिय क्र.४ व ६ च्या आदेशान्वये प्रथम हप्त्याचा प्रथम भाग म्हणून रु.१२०२.४९२८ कोटी इतका निधी सर्वसाधरण घटकांतर्गत उपलब्ध करुन दिलेला होता. त्यासमरुप राज्य हिश्श्याचा निधी संदर्भिय क्र.२,३,५,७ च्या शासन निर्णयान्वये राज्य पाणी व स्वच्छता मिशनला वितरित करण्यात आला आहे.

तद्नंतर केंद्र शासनाने संदर्भिय क्र.८ दि.२७.०३.२०२३ रोजीच्या आदेशान्वये जल जीवन मिशन अंतर्गत प्रथम हप्त्याचा दुसरा भाग म्हणून रु.११९२.८४२९ कोटी इतका निधी सर्वसाधारण घटकांतर्गत राज्यास उपलब्ध करुन दिले आहेत. त्यानुसार सर्वसाधारण घटकांतर्गत राज्य हिश्श्याचा रु.११९२.८४२९ कोटी इतका निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला उपलब्ध करुन देणे अपेक्षित होते. त्याअनुषंगाने संदर्भिय क्र.१० च्या शासन निर्णयान्वये राज्य पाणी व स्वच्छता मिशनला रु.१,०१७.६३०४११ कोटी इतका निधी उपलब्ध करुन दिलेला आहे. तसेच संदर्भिय क्र.९ च्या शासन निर्णयान्वये केंद्र शासनाच्या भांडवली कर्जासाठीच्या विशेष सहाय्य योजनेंतर्गत जल जीवन मिशनकरीता रु.८८.७३ कोटी निधी उपलब्ध करुन दिलेला असल्याने व सदर निधी समरुप राज्य हिश्श्याकरीता उपलब्ध करुन दिलेला असल्याने सन २०२२-२०२३ वित्तीय वर्षामध्ये राज्य पाणी व स्वच्छता मिशनला रु. १,१०६.३६०४११ कोटी इतका निधी (रु.१०१७.६३०४११ कोटी + रु.८८.७३ कोटी) राज्य पाणी व स्वच्छता मिशनला वितरित केला आहे. सन २०२२-२०२३ वित्तीय वर्षाचा तफावतीचा (Shortfall) उर्वरित रु.८६.४८२४८९ कोटी निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय-</u>**

जल जीवन मिशन अंतर्गत सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षामध्ये सर्वसाधारण घटकांतर्गत (राज्य हिस्सा) मागणी क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२), जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (१५) नळाव्दारे पाणी पुरवठा योजना- जल जीवन अभियान यासाठी अनुदान (राज्यक्षेत्र), ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) (२२१५ २०७१) या लेखाशिर्षाखाली, सन २०२२-२०२३ वित्तीय वर्षाचा तफावतीचा निधी (Shortfall) म्हणून रु.८६.४८२४८९ कोटी (अक्षरी-रु. शहाऐंशी कोटी अठ्ठेचाळीस लक्ष चोवीस हजार आठशे नव्वद फक्त) इतका निधी वित्त विभागाने वितरणास उपलब्ध करुन दिलेला आहे. हा निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीकरीता उघडण्यात आलेल्या राज्य नोडल खात्यामध्ये वितरित करण्यास व चालु वित्तीय वर्षात खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. राज्य पाणी व स्वच्छता मिशन (Jal Jeevan Mission Maharashtra Escrow Account) या नावाने उघडण्यात आलेल्या एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे (IFSC Code- HDFC०००१४६) येथील खाते क्र.५०१००५३०८६०६०७ मध्ये जमा करण्यात यावा. हा निधी

जमा झाल्यानंतर पुढील सर्व आवश्यक कार्यवाही मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांच्याद्वारे करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर रक्कम आहरित करण्यासाठी (पी.एफ.एम.एस. योजना केंद्र सांकेतांक ९१५० व राज्य सांकेतांक MH ३९९) आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अवर सचिव (रोखशाखा) यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे (IFSC Code- HDFC००००१४६) येथील खाते क्र.५०१००५३०८६०६०७ मध्ये जमा करावी.

३. सदर तरतूद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३ च्या शासन परिपत्रकात दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौ.सं.क्र.१९०./व्यय-३ ,दि.२७.०४.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५०२१७२६४९६२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASAD SWAMI

Digitally signed by PRASAD SWAMI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=aaf002dc55f52d8292cd1b600e0a80b7cf51b57c6f840c909c76407640c157f4, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8D84D41A9008354A0AF034B551119753B7D1C967B179AC7110EAA1867A160049, cn=PRASAD SWAMI
Date: 2023.05.03 14:51:23 +05'30'

**(प्रसाद स्वामी)**

कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. उपसचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

२. अवर सचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

यांना विनंती करण्यात येते की, वरीलप्रमाणे निधी तातडीने एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे येथील राज्य पाणी व स्वच्छता मिशनच्या खात्यात जमा करण्यात यावा.

**प्रत,**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई/ २- नागपूर
३. मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई
४. सह सचिव/ उप सचिव (अर्थसंकल्प), नियोजन व वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
७. कार्यासन पापु-०४/२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती- कार्यासन पापु १०